**उपसंचालक आरोग्य सेवा, छ.संभाजीनगर मंडळ, छ.संभाजीनगर यांच्या अंतर्गत ट्रामा केअर युनिट, ग्रामीण रुग्णालय, अजिंठा, जि.छ.संभाजीनगर येथील नवनिर्मित १२ अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अपदे-२०२४/प्र.क्र.७१/आरोग्य-४**

१० वा मजला, संकुल इमारत,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मंत्रालय, मुंबई
तारीख: ०९ मे, २०२४

<u>वाचा:-</u>

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.पदनि-३०१०/प्र.क्र.१८८/आरोग्य-३, दिनांक ०२.०२.२०११.
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.अपदे-२०२४/प्र.क्र.७१/आरोग्य-४, दिनांक १४.०२.२०२४.
३) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक २१.०२.२०२४.
४) उपसंचालक, आरोग्य सेवा, छ.संभाजीनगर मंडळ, छ.संभाजीनगर यांचे पत्र क्र.उसंआसे/नियोजन (कक्ष-क१)/ट्रॉमा केअर युनिट/अस्थाई पदे/ट्रॉमा अजिंठा/१५८९६-९००/२०२४, दिनांक ०२.०५.२०२४.

<u>प्रस्तावना :-</u>

उपरोक्त क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये उपसंचालक, आरोग्य सेवा, छ.संभाजीनगर मंडळ, छ.संभाजीनगर यांच्या अधिपत्याखालील ट्रामा केअर युनिट, ग्रामीण रुग्णालय, अजिंठा, जि.छ.संभाजीनगर येथील पदांना दिनांक १४.०२.२०२४ च्या शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात आली होती. सदर पदांना पुढेही मुदतवाढ देण्याची आवश्यकता असल्याने सदर पदांना दिनांक ०१.०३.२०२४ ते दिनांक ३१.०८.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय :-</u>

उपसंचालक, आरोग्य सेवा, छ.संभाजीनगर मंडळ, छ.संभाजीनगर यांच्या अधिपत्याखालील ट्रामा केअर युनिट, ग्रामीण रुग्णालय, अजिंठा, जि.छ.संभाजीनगर येथील १२ अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबतचा प्रस्ताव सादर करण्यात आला आहे.

२. या शासन निर्णयासोबत जोडलेल्या “परिशिष्ट-अ” मध्ये नमूद करण्यात आलेल्या ग्रामीण रुग्णालय, अजिंठा, जि.छ.संभाजीनगर येथील १२ अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०२४ ते दिनांक ३१.०८.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. सदर अस्थायी पदांचे वेतन पुढील लेखाशिर्षामध्ये खर्ची टाकण्यात यावे आणि हा खर्च सन २०२३-२४ या वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

| अ.क्र. | लेखाशिर्ष |
|---|---|
| १ | मागणी क्रमांक आर-१ मुख्य लेखाशिर्ष “२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, (०१)(४५) ट्रामा केअर युनिटची स्थापना, महाराष्ट्र आपत्कालीन वैद्यकीय सेवा (अनिवार्य), (२२१० जी २९८)” |
| २ | मागणी क्रमांक आर-१ मुख्य लेखाशिर्ष “२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, (०१)(०९)-महाराष्ट्र आरोग्य विकास प्रकल्पांतर्गत ग्रामीण/कुटीर रुग्णालयांचे जिल्हा रुग्णालयाइतका दर्जा वाढविणे (अनिवार्य) (२२१० ४६२४)” |

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक २१.०८.२०२४ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर पदांना यापुढील कालावधीकरीता मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव सादर करताना या सोबतच्या “परिशिष्ट-अ” मधील तक्त्यात प्रत्येक आरोग्य संस्थेचे नाव, एकूण मंजूर पदे, स्थायी पदे व अस्थायी पदे (तपशिलवार माहिती) याबाबतच्या माहितीसह शासनास सादर करण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०४२९१२२७१५४०१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NEELAM GIRISH SANGWAI

Digitally signed by NEELAM GIRISH SANGWAI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=a9bbc429d62201a67249f70e60acdfadbff901fbbbf45cc393dbd6aa91fbd6ca, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=81E4E52421D72A2AE32DF6C7D06ABB4E6A7B5820C3A929F328AD6C0DCA4F38C7, cn=NEELAM GIRISH SANGWAI
Date: 2024.05.13 12:06:07 +05'30'

( नीलम संगवई )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक, आरोग्य सेवा-१, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.

४. संचालक, आरोग्य सेवा-२, पुणे.

५. सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर), मुंबई.

६. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन ), मुंबई.

७. उपसंचालक, आरोग्य सेवा, छ.संभाजीनगर मंडळ, छ.संभाजीनगर.

८. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रूग्णालय, संभाजीनगर

९. जिल्हा कोषागार अधिकारी, संभाजीनगर.

१०.वित्त विभाग ( कार्यासन /व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.

११.निवडनस्ती( आरोग्य-४ ), सा.आ.वि.

# "परिशिष्ट-अ"

(शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.अपदे-२०२४/प्र.क्र.७१/आरोग्य-४,
दिनांक ०८.०५.२०२४ सोबतचे विवरणपत्र)

| अ.क्र. | आरोग्य संस्थेचे नाव | एकूण मंजूर पदे | स्थायी पदे | अस्थायी पदे |
|---|---|---|---|---|
| १ | ट्रामा केअर युनिट, ग्रामीण रुग्णालय, अजिंठा, जि.छ.संभाजीनगर | १२ | ०० | १) वैद्यकीय अधिकारी वर्ग-२ (२ पदे)<br>२) अस्थिव्यंग शल्यचिकित्सक वर्ग-२ (१ पद)<br>३) बधिरीकरण शास्त्रज्ञ वर्ग-२ (२ पदे)<br>४) परिसेविका वर्ग-३ (१ पद)<br>५) अधिपरिचारिका वर्ग-३ (३ पदे)<br>६) कक्षसेवक वर्ग-४ (३ पदे) |

********